!!जय गणेश !!आज संकष्टी चतुर्थी !!

'लोभासुर निर्दालक श्री गजानन अवतार'

एकदा भगवान श्री भोलेनाथांनी कैलास पर्वतावर एक महोत्सवाचे आयोजन केले. सगळया ब्रह्मांडात आमंत्रणे पाठविण्यात आली. प्रत्यक्ष कैलासनाथाचे आमंत्रण म्हटल्यावर सगळयाच देवीदेवता आपल्या संपूर्ण वैभवानिशी उपस्थित झाल्या. एकेक देवता समोर येत होती. शिवपूजन करून, नजराना प्रदान करून आशीर्वाद घेत होती. आरंभी श्रीहरी तथा श्रीब्रह्मदेवांशी गळाभेट झाल्यावर भगवान आसनाधीश झाले आणि मग सगळया देवतांचा क्रम लागला. एकेक देवता समोर येत होत्या. त्यात थोडयावेळाने क्रम लागला देवतांचे खजिनदार अलकानगरीचे राजे श्रीकुबेरांचा. रसिक गण रूप यक्षांचे राजे श्रीकुबेर म्हणजे रसिकतेचा मेरुमणी. श्रीकुबेरांनी श्रीशीवपार्वतीचे वंदन पूजन केले. मात्र दर्शनार्थ कुबेरांची मान वर गेली आणि वृत्ती अध:पतित झाली. आई जगदंबा पार्वतीचे ते त्रैलोक्यसुंदरीरूप पाहून वात्सल्यभाव जागृत होण्याऐवजी श्रीकुबेरांच्या मनात कामभावना जागृत झाली. श्रीकुबेरांच्या नजरेतील ते परिवर्तन देवी पार्वतीने टिपले आणि ती भीषण संतापली. माझ्याकडे पाहून अशी भावना जागृत होतेच कशी? अशा भीषण रागाने तिने कुबेरांकडे भेदक नजर फेकली आधीच उफाळलेली कामवासना आणि त्यात मातेच्या विश्ववविनाशक क्रोधाचा बसलेला दणका श्रीकुबेर स्खलित झाले. आणखीनच लज्जित झाले. तशीच मान खाली घालून बाहेर पडले. सगळी सभा स्तंभित झाली होती.

जगदंबा अत्याधिक संतापली. शेवटी श्रीभोलेनाथांनीच शांत केले. ते म्हणाले अग! अशी संतापतेस कशाला? तू आहेसच इतकी सुंदर की युगायुगाची समाधी सोडून मी तुझ्या सौंदर्याने घायाळ झालो मग त्या बालकाचा काय दोष? जाऊ दे माफ कर. क्षमाशीला आहेस तू. श्रीशंकरांच्या बोलण्याने पार्वती शांत झाली. मग त्यांनी कुबेरास बोलावून घेतले. त्यांचीही समजूत काढली. त्यांची अवस्था मेल्याहून मेल्यासारखी झाली. पण श्रीशंकरांनी समजावले. त्या शक्तीपतनातून निर्माण झालेल्या त्या मुलास घेऊन जाण्यास सांगितले. श्रीकुबेरांची इच्छाच नव्हती. पण या सगळया प्रकारानंतर आणि त्यातही श्रीशंकरांना नाही म्हणायची त्यांची ताकदच नव्हती त्यामुळे नाईलाजाने कुबेर बालकासह अलका नगरीत परतले.

नियतीने तिकडे एक वेगळाच डाव मांडला. पाताळामध्ये तार नामक राक्षस आपल्या कुळाच्या भावी वृद्धीसाठी चिंताग्रस्त होता. राक्षसराज्य त्रैलोक्यावर कसे प्रस्तापित होईल या चिंतेत होता. कर्मधर्म संयोगाने देवर्षी नारदा तेथे आले. देवर्षी देवतांइतकेच दैत्यांनाही पुज्य वाटतात. ताराने त्यांची पूजा केली आणि आपली समस्या सांगितली. देवर्षींच्या मुखातून नियतीने आपली चाल पुढे केली. श्रीनारदांनी त्यास सांगितले की अलका नगरीत जा कुबेराच्या नवजात बालकास पळवून आण. त्याच्याद्वारे तुझ्या सगळया मनीषा पूर्ण होतील. तार राक्षस अलकेस पोहचला बालकास पळवून मोकळा झाला.

देवखजिनदार कुबेरास वार्ता कळली पण त्यांचा मुलाच्या ठायी लोभच नव्हता त्यामुळे पळवून नेल्याचे त्यांना दु:ख झालेच नाही. मुलाठायी लोभ नसला तरी जगदंबेच्या रूपाप्रती निर्माण

झालेल्या लोभापायी जन्माला आलेल्या त्या बालकाचे नाव भविष्यात लोभासुर असेच झाले.

ताराने बालक दैत्यगुरु शुक्राचार्यांकडे नेले. बालकाच्या मस्तकलेखास पाहुन त्यांनी त्यास श्रीशिवपंचाक्षरी महामंत्राचा उपदेश दिला. बालकाने अचाट तप:श्चर्या केली आणि परिणाम रुपात त्रैलोक्य विजयासह मनोवाणीमयापासून मृत्यु नसावा असा अपूर्व वर लाभला.

वरदान संपन्न लोभासुराने श्रीशुक्राचार्यांच्या आशीर्वादानंतर सकल त्रैलोक्यास वश केले. देवतांवर नेहमीप्रमाणे वनवासाची वेळ आली.

अडचण आल्यावरच भगवान आठवतात या नियमाला देवताही अपवाद नसतात. समस्याग्रस्त, वनवासी देवता लोभासुर निर्दालनाचा विचार करू लागल्या पण उपाय दिसेना. बराच काळ गेला आणि त्याकाळातील तपाच्या फलरुपात महामुनी रैभ्यांचे तेथे आगमन झाले. सगळयांनी त्यांची महापूजा केली आणि उपायार्थ प्रार्थना केली. महर्षी रैभ्यांनी सकलमनोकामना पूरक एकमेव उपाय वर्णिला श्रीगणेशोपासना.
सगळया देवतांनी, ऋषीमुनींनी गणेशाराधानेला महामार्ग जोपासला आणि परिणामरुपात भगवान श्री स्वानंदनाथ 'गजानन अवतार धारण करते झाले.

श्रीगणेशांनी आरंभी श्रीशंकरांना शिष्टाई साठी पाठविले पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही. राक्षसराज युद्धार्थ सज्ज झाला. मग मोरयांनी लीला रुपात आपला परशु सोडला. त्यातून निघालेल्या भीषण अग्निज्वालांनी दैत्य सैन जळू लागले. लोभासुराने त्यावर पर्जन्यास्त्राचा प्रयोग केला. पण त्याने हतप्रभ व्हायला ते सामान्य अग्निअस्त्र थोडेच होते. त्याने पर्जन्यास्त्रही सुकविले आणि तरीही अग्निवर्षाव सुरूच राहिला. या अकल्पित प्रकाराने भयभीत लोभासुर श्रीशुक्राचार्यांना शरण गेला. दैत्यगुरुंनी त्यास श्रीगजानन रहस्य समजावून दिले. ते आपण आगामी चतुर्थीस पाहू तोवर

जय गजानन!जय गणेश!

अधिक माहिती करता संपर्क
स्वानंदशास्त्री गजानन पुंड
ईमेल: sgpund@rediffmail.com
For More Details Visit Our Website: www.dagdushethganpati.com